**सन २०१७-१८ मध्ये राज्यातील आदिवासी जिल्ह्यामध्ये आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाड व भाजीपाला लागवडीची योजना राबविण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्र. आपयो-२०१७/प्र.क्र. १०७ /९अे**

हुतात्मा राजगुरू चौक,मादाम कामा रोड,

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.

दिनांक- ०५ जून, २०१७.

वाचा:-

१. संचालक फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक- कृआ/फलो-३/आदिवासी परसबाग/१७-१८/१२५०/१७, दिनांक १२/०५/२०१७.

२. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८/०४/२०१७.

प्रस्तावना :-

राज्यातील १३ जिल्हयांतील आदिवासी भागातील कुपोषणाचे प्रमाण कमी करण्याच्या उद्देशाने व आदिवासी बांधवांना पौष्टिक आहार पुरविण्यासाठी, आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत पौष्टीक भाजीपाला व फळांची निवड करुन त्याची लागवड करण्यास प्रोत्साहन देण्यासाठी **"आदिवासी कुंटुबांच्या परसबागेत फळझाड व भाजीपाला लागवडड** ही योजना राज्यात सन २००३-०४ पासून राबविण्यात येत आहे. सदर योजना सन २०१७-१८ मध्ये राज्यात राबविण्याकरीता रू.२०.०० लाख निधीचा प्रस्ताव संचालक फलोत्पादन यांनी शासनास सादर केला आहे. सदर योजना राबविण्याकरीता सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात रु. २०.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

सन २०१७-१८ च्या प्रथम नऊमाही करीता (डिसेंबर-२०१७ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमावरील खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ८० टक्केच्या मर्यादेत वितरण व संनियंत्रण प्रणालीव्दारे (बिम्स) वितरीत केला जाईल असे आदेश शासन परिपत्रक वित्त विभाग दि.१८/०४/२०१७ अन्वये, देण्यात आले आहेत.

सदर योजना सन २०१७-१८ मध्ये राज्यात राबविण्यास प्रशासकीय मान्यता व वित्त विभागाच्या आदेशानुसार अर्थसंकल्पीत निधीच्या ८० टक्के वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यास अनुसरून शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय :-

राज्यातील ठाणे, पालघर, पुणे, नाशिक, धुळे, नंदूरबार ,जळगांव, अहमदनगर, नांदेड, यवतमाळ, गडचिरोली, चंद्रपूर व अमरावती या १३ जिल्हयातील आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाड व भाजीपाला लागवडीची योजना सन २०१७-१८ मध्ये राबविण्याकरीता प्रशासकीय मान्यता देण्यात येत असून सदर योजना राबविण्यासाठी ८० टक्के च्या मर्यादेत रुपये १६ लाख (रुपये सोळा लाख फक्त) इतकी रक्कम खर्च करण्यास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

१. **लाभार्थीची निवड -** आदिवासी क्षेत्रातील ज्या कुपोषणग्रस्त गावांमधील आदिवासी कुटुंबांकडे शेतजमिन किंवा परसबाग उपलब्ध असेल अशा आदिवासी लाभार्थीची निवड सन २०१७-१८ यावर्षी करण्यांत येईल. ज्या आदिवासी कुटुंबात कुपोषित बालके असतील अशा आदिवासी शेतक-यांना या योजनेचा प्राधान्याने लाभ देण्यात यावा.

२. **अर्जदाराची ओळख -** अर्जदाराची ओळख पटविण्याकरीता, तसेच तो खरोखर शेतकरी आहे, तसेच त्याने दिलेले बँक खाते क्रमांक बरोबर आहे, हे निश्चित करण्याकरिता लाभार्थी शेतकऱ्याने खालीलप्रमाणे कागदपत्रांची स्वयंसाक्षांकित प्रत देणे आवश्यक राहील.

   १) शेतकऱ्यांच्या स्वत:चे नावे असलेल्या शेतीच्या क्षेत्राचे ७/१२ व ८ अ चे दाखले.
   २) लाभार्थी अनुसुचित जाती / जमाती या प्रवर्गातील असल्यास त्याबाबत प्राधिकृत अधिकाऱ्यानी दिलेल्या वैध जात प्रमाणपत्राची प्रत.
   ३) आधार ओळखपत्राची प्रत
   ४) अर्जदार शेतकऱ्याने त्याचे बँकेचे खाते आधार क्रमांकाशी जोडून घेणे आवश्यक राहील आणि त्याकरीता त्याने बँकेला दिलेल्या पत्राची व बँकेकडून मिळालेल्या पोहोच पावतीची प्रत.

३. या योजनेंतर्गत लागवड करावयाची फळझाडे/भाजीपाला :-

   १) चिकू २) आंबा ३) पेरू ४)कागदी लिंबू ५) पपई ६) शेवगा ७) कडीपत्ता ८) अळू ९) मेथी १०) पालक ११) लालभोपळा १२) दुधीभोपळा १३) मागणीनुसार इतर भाजीपाला जसे दोडका, गवार, वांगी व इतर.

४. लाभ द्यावयाचे साहित्य व सामुग्री पुरवठा :-

या योजनेतंर्गत प्रती आदिवासी कुटुंबांना कमाल रु.२५२/- एवढा खर्च अपेक्षित आहे. लाभार्थ्यांना आवश्यकतेनुसार रोपे, कलमे व भाजीपाला बियाणे पुरविण्यात येतील. लाभार्थ्यांना फळझाडे व भाजीपाल्याची कलमे/रोपे ही शासकिय अथवा नोंदणीकृत खाजगी रोपवाटिकांमधून घेता येतील. यापैकी बियाणे घटकाचा पुरवठा महाबीजकडून केला जाईल. सदर अनुदान थेट लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये वर्ग करण्यात येईल.

५. **अंमलबजावणी करणारी यंत्रणा-** सदर योजना संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचेमार्फत राबविण्यात येईल.

६. **आहरण व संवितरण अधिकारी-** सदर योजनेसाठी संबंधित जिल्ह्याचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

७. **लाभार्थी प्रशिक्षण-** रोपांची लागवड, जोपासना, फळे काढणी, फळे व भाजीपाला यांचे खाद्य पदार्थ तयार करणे इत्यादीबाबत प्रशिक्षण ग्रामस्तरावर देण्यात येईल. प्रशिक्षणासाठी होणारा खर्च आत्मा मधून करण्यात यावा.

८. **सनियंत्रण आढावा :-** संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, पुणे यांना संनियत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर योजना राबविण्याबाबतची सविस्तर मार्गदर्शक सूचना संचालक फलोत्पादन संबंधिताना निर्गमित करतील. संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, या योजनेचा गांवनिहाय आढावा घेऊन लागवडीच्या संबंधीचा अहवाल विभागीय कृषि सहसंचालकामार्फत संचालक फलोत्पादन यांना सादर करतील.

या योजनेंतर्गत लाभ घेणाऱ्या लाभार्थ्यांची यादी तपशीलासह कृषि विभागाच्या अधिकृत संकेत स्थळावर प्रदर्शित करण्यात येईल.

९. **योजनेतंर्गत तपासणी - या** योजनेतंर्गत लागवड केलेल्या परस बागामधील लागवडीची तपासणी खालील प्रमाणे करण्यांत येईल.

| | | |
|---|---|---|
| १) | विभागीय कृषि सहसंचालक | ०.५ टक्के |
| २) | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | १ टक्के |
| ३) | उपविभागीय कृषि अधिकारी | २ टक्के |
| ४) | तालुका कृषि अधिकारी | ५ टक्के |
| ५) | मंडळ कृषि अधिकारी | २५ टक्के |
| ६) | कृषि पर्यवेक्षक | १०० टक्के |

१०. या योजनेसाठी होणारा खर्च रु.१६ लाख (रु.सोळा लाख फक्त )सन २०१७-१८ या वर्षाकरीता मंजूर व अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीनुसार खालील लेखाशिर्षातून भागाविण्यात यावा.

"मागणीक्र.डी -३,
२४०१- पीक संवर्धन,
(११९), बागायती व भाजीपाला पिके
(०१) (२७) आदिवासी जिल्हयात परसबाग योजना
(२४०१ ३६५४)
३३ अर्थसहाय्य."

११. आदिवासी कुटुंबामध्ये कुपोषणाचा प्रश्न मोठ्या प्रमाणावर असल्याने विशेष बाब म्हणून ज्या आदिवासी जिल्ह्यातील सर्व आदिवासी शेतकऱ्यांना या योजनेचा यापुर्वी लाभ दिलेला आहे, अशा जिल्ह्यामध्ये ज्या आदिवासी शेतकऱ्यांनी या योजनेमध्ये पुर्वी लाभ घेतलेला आहे त्यांना चक्रीय पध्दतीने किमान ५ वर्षाच्या कालावधी नंतर पुनश्च: लाभ देण्यात यावा.

१२. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करून देण्यात आलेल्या शासन निर्णयाचा विनियोग तात्काळ करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (फलोत्पादन) यांनी शासनास वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे.

१३. या शासन निर्णयाची अंमलबजावणी काटेकोरपणे होईल याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. या योजनेचा खर्च करताना सर्व वित्तिय नियम, विनियम,वित्तिय शासन निर्णय, राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे या संदर्भातील निरिक्षण यांचे पालन होईल या अटीच्या अधिन राहून निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१४.हे आदेश शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८/०४/२०१७ मधील अटींची पुर्तता करण्याच्या अधिन राहून, प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०६०८११५५३११७०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Kamlakar Yeshvant Vanjare

Digitally signed by Kamlakar Yeshvant Vanjare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=AGRICULTURE AND ADF DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c08eef62183520696d2005b153b8cc2a552337a23fc4d457a4434216d9324c3b, serialNumber=6fd0ddfb9412fda09432e5f8a3e140c065770ba4ca63ef6fc5ba354810e2828b, cn=Kamlakar Yeshvant Vanjare
Date: 2017.06.08 14:15:58 +05'30'

**( क. य. वंजारे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, (कृषी) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.राज्यमंत्री(कृषी), यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.प्रधान सचिव (कृषी) यांचे स्वीय सहाय्यक,कृषि व पदुम विभाग, मंत्रालय , मुंबई
४. आयुक्त(कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य , पुणे.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,पुणे
६. संचालक (फलोत्पादन),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य , पुणे.
७. सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
८. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
९. महालेखापाल-१-२(लेखा व अनुज्ञेयता) (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१०.अधिदान लेखाधिकारी, मुंबई
११. सहायक संचालक (लेखा),आयुक्त कृषि यांचे कार्यालय, पुणे.
१२.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधानभवन, मुंबई
१३.माहिती व जनसंपर्कसंचालनालय,मंत्रालय, मुंबई-३२ (प्रसिध्दीसाठी)
१४.कार्यासन ९-अे, निवडनस्ती.